20 1103101553 52001

**पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण**
**प्राधिकरणाच्या ३१ मीटर रस्त्यात येणारे खाजगी मालकीच्या जमिनीचे क्षेत्र ताब्यात घेवून पर्यायी क्षेत्र देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पीसीएन ३००६/५६६/प्र.क्र.७९/०६/नवि-२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- ०९ एप्रिल, २००७**

**वाचा :-** मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र.विप्रा/भू.वि.१/००२, दिनांक १ जानेवारी, २००६ आणि प्राधिकरण सभा क्र.२६०, दि.१६/११/२००५ व त्यासोबतचे नकाशे

**प्रस्तावना :--**

पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकारणातील पेठ क्र.५,८ व पेठ क्र.१४ मधून जाणा-या ३१ मिटर रस्त्यामध्ये बदल केल्यामुळे (रस्त्याचे वळण रद्द करुन रस्ता सरळ केल्यामुळे) सुधारित रस्त्यामध्ये येणा-या खाजगी जागांच्या मालकांना तेवढेच पर्यायी क्षेत्र देणे आवश्यक आहे. सदर रस्ता सरळ केल्यामुळे बाधित होणारे मौजे मोशी (बो-हाडेवाडी) येथील गट क्र.११८२ चे क्षेत्र १६५७.५० चौ.मी. तसेच गट क्रमांक ११५८ चे क्षेत्र ८४.९० चौ.मी. असे एकूण १७४२.४० चौ.मी. इतके क्षेत्र ताब्यात घेऊन संबंधित खाजगी जमिनीच्या मालकांना तेवढेच पर्यायी क्षेत्र देण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन पत्रान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांनी प्राधिकरण सभा क्र.२६०, दिनांक १६/११/२००५ मध्ये मंजूर झालेला विषय विचारात घेवून शासनास सादर केला होता. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :--**

पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाच्या पेठ क्र.५, ८ व पेठ क्र.१४ मधून जाणा-या ३१ मीटर रस्त्याचे वळण रद्द करुन रस्ता सरळ केल्यामुळे बाधित होणा-या संपादनाबाहेरील मौजे मोशी (बो-हाडेवाडी) येथील गट क्र.११८२ चे क्षेत्र १६५७.५० चौ.मी. तसेच ११५८ चौ.क्षेत्र ८४.९० चौ.मी. या क्षेत्राचा ताबा स्विकारुन, संबंधितांना प्राधिकरणाच्या संपादन क्षेत्रातील तेवढेच क्षेत्र अदलाबदल दस्ताने देण्यास प्राधिकरणाच्या भू-वाटप नियम, १९७३ च्या नियम-५ अन्वये प्राप्त अधिकारात शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,**

०९/०४/०७

**( सुनील कोठेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) अध्यक्ष, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण तथा आयुक्त, पिंपरी-चिंचवड मनपा, जि.पुणे,
(२) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे
(३) मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
(४) प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
(५) निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई